राष्ट्रीय कृषि विकास योजना (प्रति थेंब अधिक पिक) अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सन २०२४-२५ च्या अर्थसंकल्पीय तरतूदीमधून निधी वितरीत करण्यासाठी राष्ट्रीय कृषि विकास योजना सविस्तर प्रकल्प मधून पुनर्विनियोजनाने निधी उपलब्ध करुन देण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक :- बीजीटी-२०२४/प्र.क्र. ३४ /अर्थसंकल्प (विघयो)**

मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२

दिनांक :- २४ मार्च, २०२५

वाचा :- १) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि.१२.०२.२०२५

२) कृषि व पदुम विभागाची नस्ती क्र.कृवपदुम-२५०१६/७/२०२५-एमएजी-२अे

**शासन निर्णय :-**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय कृषि विकास योजना प्रति थेंब अधिक पिक या योजनेंतर्गत अनुसूचित जाती प्रवर्गासाठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षात मागणी क्र.एन-३, २४०१ पीक संवर्धन, ७८९, अनुसूचित जातींसाठी विशेष घटक योजना, (०१) अनुसूचित जाती घटक कार्यक्रमांतर्गत योजना, (०१) (२१) प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्मसिंचन) (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २४०१बी२८६, ३३-अर्थसहाय्य खाली सुधारीत अंदाजात रु.२९७०.०० लाख तर (०१) (२२) प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना- प्रति थेंब अधिक पीक (सूक्ष्मसिंचन) (राज्य हिस्सा ४०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २४०१ बी २९५, ३३-अर्थसहाय्य खाली सुधारीत अंदाजात रु.१९८०.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आला आहे.

वित्त विभागाच्या संदर्भाधीन क्रमांक १ येथील परिपत्रकान्वये निधी वितरणाच्या मार्गदर्शक सूचना देण्यात आल्या आहेत. या अनुषंगाने कृषी व पदुम विभागाच्या संदर्भाधीन क्र.२ च्या नस्तीवर वित्त विभागाने दिलेल्या सहमतीस अनुसरुन राष्ट्रीय कृषि विकास योजना सविस्तर प्रकल्प या योजनेमधून राष्ट्रीय कृषि विकास योजना प्रति थेंब अधिक पिक या योजनेमध्ये (केंद्र हिस्सा ६०%) (कार्यक्रम) लेखाशिर्ष २४०१ बी २८६, ३३-अर्थसहाय्य याकरिता रु.३११.०० लाख तर लेखाशिर्ष २४०१ बी २९५, ३३-अर्थसहाय्य (राज्य हिस्सा ४०%) याकरिता रु.२०७.३३ लाख इतका निधी पुनर्विनियोजनाव्दारे प्रशासकीय विभाग प्रमुख म्हणून प्रधान सचिव (कृषी व पदुम) विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर (BEAMS) वितरीत करण्यास मंजूरी प्रदान करण्यात येत आहे.

२. सदर निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात आला आहे. सदर वितरीत निधी खर्च करतांना नियंत्रक अधिकारी यांनी विहित पध्दतीने काटकसरीच्या उपाययोजना करुन खर्च करावा. सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल,लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र,

संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, समाजकल्याण, संबंधित प्रादेशिक उप आयुक्त, सामाजकल्याण, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग व कृषी व पदुम विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत दक्षता घ्यावी.

३. विभाग प्रमुख / नियंत्रक अधिकारी यांनी अनुसूचित जाती घटकांसाठीचा निधी त्याच घटकांवर खर्च होईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला या योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेला निधी खर्च करतांना विभागप्रमुख तसेच नियंत्रक अधिकाऱ्यांनी महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.२.२०२५ च्या शासन परिपत्रकातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावी.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.१२.०४.२०२३ रोजीच्या शासन परिपत्रकान्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभागाचा सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलबध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२५०३२४१७४२२५३४२२ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

SOMNATH NAMDEO BAGUL

Digitally signed by SOMNATH NAMDEO BAGUL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOCIAL JUSTICE AND SPECIAL ASSISTANCE DEPARTMENT, 2.5.4.20=b01714c1480a47cec5943a1c3c73ea95af0534418cf92d1ac844331c4116879d, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=4807C89831881EDE55B0D82CB9991539D1BD33C6F8A64931D9194D5E2CBDCF56, cn=SOMNATH NAMDEO BAGUL
Date: 2025.03.24 17:43:17 +05'30'

**( सो.ना. बागुल )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) प्रधान सचिव (कृषी), कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
२) आयुक्त, कृषी, महाराष्ट्र राज्य
१) आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२) सर्व प्रादेशिक उप आयुक्त (समाजकल्याण) (समाजकल्याण आयुक्तालयामार्फत)
३) ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५वा मजला, विधानभवन, मुंबई
४) महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/ नागपूर
५) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई
७) निवडनस्ती (अर्थसंकल्प/ विघयो), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग